महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या आस्थापनेवरील "कार्यासन अधिकारी / अधिक्षक" हे पद प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत श्रीमती र.अ.उपानेकर, सहायक कक्ष अधिकारी

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि २५१९/प्र.क्र.१२२/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १० जानेवारी, २०२०

वाचा :- १) सा.प्र.वि. पत्र क्र. प्रतिनि २५१९/प्र.क्र.१२२/१४-अ, दिनांक ०४-०९-२०१९ चे पत्र
२) पाणी परुवठा व स्वच्छता विभागाचा क्र. मजीप्रा -११९९/प्र.क्र.११७/ पा.पु. २३, यांचा दिनांक १४-०८-२०१९ यांचा प्रस्ताव

**शासन आदेश**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत करावयाची कार्यपध्दती सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१७/प्र.क्र.१२०/१४, दिनांक ३१.८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे. या शासन निर्णयातील तरतूदीनुसार पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने संदर्भाधिन क्र.२ च्या प्रस्तावान्वये केलेल्या विनंतीनुसार संदर्भाधिन क्र. १ च्या पत्रान्वये मंत्रालयीन विभागातील सहायक कक्ष अधिकाऱ्यांकडून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या आस्थापनेवरील "कार्यासन अधिकारी / अधिक्षक" हे पद प्रतिनियुक्तीने भरण्याकरीता इच्छुकता मागविण्यात आली होती त्यानुसार मंत्रालयीन विभागाकडून एकूण प्राप्त इच्छुक्तेमधून श्रीमती र.अ.उपानेकर, सहायक कक्ष अधिकारी कृषि व पदुम विभाग यांच्या सेवा पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अधिपत्त्याखालील महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या आस्थापनेवरील "कार्यासन अधिकारी/अधिक्षक" हे पद (वेतनश्रेणी एस१४:३८६००-१२२८००) च्या रिक्त पदावर प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. श्रीमती र.अ.उपानेकर, सहायक कक्ष अधिकारी कृषि व पदुम विभाग यांच्या सेवा महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बेलापूर, नवी मुंबई यांच्या आस्थापनेवरील "कार्यासन अधिकारी / अधिक्षक" या पदावर **प्रथमत: २ वर्षाच्या** कालावधीसाठी खालील अटी व शर्तीनुसार प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

(अ) ज्या तारखेला शासकीय सेवेतील पदाचा कार्यभार सुपूर्द करील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला संबंधित कर्मचारी आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारील त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्याला परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/संवर्ग नियंत्रण अधिकारी/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्याला मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्याने मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्याला मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

३. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत संबंधित कर्मचाऱ्यांना प्रतिनियुक्ती भत्ता देय असणार नाही. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा...इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक १७-१२-२०१६ व १६-०२-२०१८ मधील तरतुदी विचारात घेऊन, कृषि प पदुम विभागाने प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती याबाबत पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग/का.पापु २३ यांच्याशी सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

४ विभागाने प्रतिनियुक्तीने कार्यमुक्त करावयाच्या आदेशात प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होण्याचा दिनांक नमूद करावा.

५. श्रीमती उपानेकर, सहायक कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी त्यांचे प्रशासकीय विभाग आणि पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग/का.पापु २३ यांचेमार्फत हाताळण्यात येतील

६. श्रीमती उपानेकर, यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी विभागाने तत्काळ कार्यमुक्त करावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११०१७१४०६८८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ad a8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f 73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.01.10 16:52:57 +05'30'

**( ग. भि. गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती र.अ.उपानेकर, सहायक कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
(विभागामार्फत)

**प्रत :-**

१) मुख्य प्रशासकीय अधिकारी (प्र), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मध्यवर्ती कार्यालय, सिडको भवन, दक्षिण कक्ष, २रा मजला, बेलापूर, नवी मुंबई. यांना माहितीस्तव सादर.
२) उप सचिव (पा.पु.-२३), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, गो.ते. रुग्णालय इमारत आवार, ७ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
३) उप सचिव (आस्थापना) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
४) सा.प्र.वि./१४-अ (संग्रहार्थ).